**राज्यातील हवामानावर आधारीत पथदर्शक फळपिक विमा योजना सन २०१५ अंतर्गत संत्रा व मोसंबी फळपिकांना मृग बहारासाठी पहिल्या टप्प्यात लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विमायो १०१५ /प्र.क्र.६४(१)/१४ अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तारभवन, मुंबई-४०० ०३२.
तारीखः १० जून, २०१५.

वाचा:-

१) **केंद्रीय कृषि व सहकार विभागाचे आंग्लभाषीय पत्र क्र :- १३०१५/०४/२००४-क्रेडीट-II दि. २० मार्च, २०१५.**
२) **संचालक ( फलो ) यांचे पत्र क्रमांक :- फलो- १ / हआफपिवियो /१५९०/ २०१५, दि. १८ मे, २०१५.**

प्रस्तावना:-

राज्यातील द्राक्ष, केळी, संत्रा, मोसंबी, चिकू, डाळींब, पेरु आंबा व काजू या निवडक फळपिकांना हवामानावर आधारित फळपिक विमा योजना सन २०१४ व्दारे प्रायोगिक तत्त्वावर निवडक प्रतिकूल हवामान घटकापासून संरक्षण देण्यात आले होते. सदर योजनेस असलेली मागणी लक्षात घेता, सन २०१५ मध्ये सदर योजना राज्यातील संत्रा व मोसंबी या फळपिकांकरिसाठी निवडक जिल्ह्यांमध्ये मृग बहारसाठी टप्पा १ मध्ये लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यस्तरीय पीक विमा समन्वय समितीच्या दि. २५ मे, २०१५ च्या बैठकीत दिलेल्या मान्यतेप्रमाणे ९ ते १८% पर्यंत विमा दर असलेल्या जिल्ह्यातील सर्व अधिसूचित फळपीकांकरीता हवामानावर आधारित फळपिक विमा योजना सन २०१५ मध्ये मृग बहार टप्पा १ मध्ये संत्रा व मोसंबी फळपिकांचा अंतर्भाव करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे. सदर योजना सन २०१५-१६ मध्ये सहपत्र -१ मधील जिल्ह्यामध्ये सहपत्र -२ मध्ये नमूद केल्यानूसार लागू करण्यात येईल. संदर्भ हवामान केंद्र सहपत्र -१ मध्ये नमूद केल्यानूसार प्रत्येक तालुक्यातील महसूल मंडळ पातळीवर स्थापन करण्यात येईल व तेथे नोंदल्या गेलेल्या हवामानाच्या तपशिलानूसार सहपत्र -२ मध्ये नमूद केल्याप्रमाणे निवडलेल्या विमा कंपन्यामार्फत शेतक-यांना बँकांमार्फत नुकसान भरपाई परस्पर देय होईल.

**२) योजनेची उद्दिष्ट्ये:-**

१) पाऊस, पावसातील खंड व सापेक्ष आर्द्रता यापासून फळपिक विमा योजनेच्या तरतूदीप्रमाणे फळपिकांना निर्धारीत केलेल्या कालावधीत शेतकऱ्यांना विमा संरक्षण आणि आर्थिक सहाय्य देणे.

२) हवामान घटकावर आधारीत फळपिक नुकसानीच्या अत्यंत कठीण परिस्थितीत शेतकऱ्यांचे आर्थिक स्थैर्य अबाधित राखणे.

### ३) योजना कार्यान्वित करणारी यंत्रणा, समाविष्ट पिके व समाविष्ट शेतकरी

अ) सदर फळपिक विमा योजना खालील यंत्रणेमार्फत खालील जिल्हयातील फळपिकांसाठी सहपत्र-१ मध्ये नमूद केलेल्या महसूल मंडळ पातळीवर कार्यान्वित करण्यात येईल.

| अ.क्र. | विमा कंपनीचे नाव | अ.क | जिल्हे | फळपिक |
|---|---|---|---|---|
| १ | **चोला मंडलम एमएस जनरल इन्शुरन्स कंपनी,** १०३ रुपा प्लाझा, जवाहर रोड घाट कोपर (पू), मुंबई ७७<br>फोन नं :- ०२२-३०८६२७७०<br>फॅकस नं :- ०२२-३०८६२७७०<br>ई -मेल :- sableR@cholamsispl.com | १ | यवतमाळ | संत्रा |
| | | २ | बुलढाणा | संत्रा, मोसंबी |
| २ | **बजाज अलायन्स जनरल इन्शुरन्स कंपनी,** पहिला मजला, टॉवर १, कॉमर्स झोन, समर्थ अशोक पथ, येरवडा, पुणे-६<br>फोन नं :- ०२०-६६२४०१७९<br>फॅक्स नं :-०२०-६६२४०१११<br>ई-मेल:-annpam.shrey@bajajallianz.co.in | १ | नागपूर | संत्रा, मोसंबी |
| | | २ | हिगोली | संत्रा, मोसंबी |
| | | ३ | वाशिम | संत्रा |
| ३ | **एचडीएफसी-अर्गो जनरल इन्शुरन्स कंपनी**, ६ वा मजला, लिला बिझीनेस पार्क, अंधेरी - कुर्ला रोड, अंधेरी (पूर्व), मुंबई-४०००५९.<br>फोन नंबर :- ०२२-६६३८३६००<br>फॅक्स नंबर :- ०२२-६६३८ ३६९९<br>ई-मेल:- nitin.kadam@hdfcergo.com<br>rajbir.chadha@hdfcergo.com | १ | अमरावती | संत्रा, मोसंबी |
| ४ | **इफको टोकिया जनरल इन्शुरन्स कंपनी लिमिटेड,**<br>रुरल ॲन्ड को. ऑपरेशन डिपार्टमेंट,४ था मजला प्लॉट क्र.३ सेक्टर २९, गुरगाव, हरियाणा, १२२००१.<br>फोन नं. :- ०२०-४१०८०२००<br>फॅक्स नं:- ०२०-४१०८०२०२<br>ई-मेल:-<br>ramakant.mandhare@iffcotokio.co.in<br>Vishwas.kesbhat@iffcotokio.co.in | १ | अकोला | संत्रा |

| अ.क्र. | विमा कंपनीचे नाव | अ.क | जिल्हे | फळपिक |
|---|---|---|---|---|
| ५ | <u>रिलायन्स कंपनी</u><br>चिंतामणी अव्हेन्यु, ५ वा मजला,<br>वेस्टर्न एक्सप्रेस हायवे,<br>विरवानी इंडस्ट्रिज इस्टेट ( पश्चिम ),<br>गोरेगाव, मुंबई ४००० ६४<br>फोन नं:- ०२२-३०४७९२१३<br>ई-मेल:- santosh.parab@rcap.co.in | १ | वर्धा | संत्रा, मोसंबी |

ब) हवामान आधारित फळपिक विमा योजना २०१५ अंतर्गत मृग बहारासाठी पहिला टप्प्यात संत्रा व मोसंबी फळपिकांसाठी विमा संरक्षण देण्यात येत आहे.

क) सहपत्र-१ मध्ये दर्शविलेले अधिसूचित क्षेत्र हे योजना राबविण्याचे क्षेत्र आहे. व यामधील अधिसूचित फळपीके म्हणजे **संत्रा व मोसंबी घेणारे सर्व शेतकरी या योजनेत भाग घेण्यास पात्र आहेत.**

ड) विविध वित्तीय संस्थांकडे पीक कर्जासाठी अर्ज केलेल्या व ज्याची अधिसूचित फळपिकासाठी पिक कर्ज मर्यादा मंजूर आहे अशा सर्व शेतकऱ्यांना ही योजना सक्तीची राहील.

इ) बिगर कर्जदार शेतकऱ्यांना ही योजना ऐच्छिक राहील.

ई) सदर योजना ३ मधील "ब" येथे निवड केलेल्या फळपिकाखालील किमान २० हेक्टर किंवा जास्त उत्पादनक्षम क्षेत्र असणाऱ्या सहपत्र-१ मध्ये दर्शविलेल्या महसूल मंडळात राबविण्यात येईल.

४) अधिसूचित फळपिके, विमा संरक्षण प्रकार (हवामान धोके), विमा संरक्षण कालावधी, विमा संरक्षित रक्कम, प्रमाणके (ट्रिगर) व नुकसान भरपाई रक्कम सहपत्र-दोन मध्ये नमूद केल्यानुसार राहातील.

५) अधिसूचित फळपिकांचा विमा हप्ता दर १२ टक्के ते १८ टक्के राहणार असून त्यामधील समाविष्ट हवामान धोके - विमा संरक्षण कालावधी खालीलप्रमाणे राहील :-

| अ.क्र. | फळपीके | समाविष्ट धोके | विमा संरक्षण कालावधी | |
|---|---|---|---|---|
| १) | संत्रा (मृग बहार) | कमी पाऊस | १५ जून, २०१५ | १५ जुलै, २०१५ |
| | | पावसाचा खंड | १६ जुलै, २०१५ | १५ ऑगस्ट, २०१५ |
| २) | मोसंबी (मृग बहार) | कमी पाऊस | १५ जून, २०१५ | १५ जुलै, २०१५ |
| | | पावसाचा खंड | १६ जुलै, २०१५ | १५ ऑगस्ट, २०१५ |

**६) विमा हप्ता अनुदान - ( केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनेनूसार निर्धारित विमा दर )**

पथदर्शक हवामान आधारीत पीक विमा योजनेमध्ये भाग घेणाऱ्या सर्व शेतक-यांना विमा हप्त्यापोटी ५० टक्के अनुदान देय आहे. या अनुदानाच्या रकमेत केंद्र शासनाचा २५ टक्के व राज्य

शासनाचा २५ टक्के हिस्सा राहील आणि शेतक-याने स्वत:ची ५० टक्के रक्कम विमा हप्त्यापोटी भरावयाची आहे. ह्यासंबंधीची आकडेवारी सहपत्र-३ प्रमाणे राहील.

विमा संरक्षित रक्कमेची परिगणना :- वरील संदर्भ क्रमांक १ मधील केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनामधील मुद्दा क्रमांक १० मधील (१०.२) नूसार एखाद्या फळपिकाचा विमा दर विमा कंपनीने निर्धारित दरापेक्षा जास्त दर्शविलेला असेल तर वाढीव विमा दराच्या प्रमाणात विमा संरक्षित रक्कम कमी होईल. उदा :- ( विमा संरक्षित रक्कमेची परिगणना ) संत्रा पिकाचे १२ टक्के प्रमाणे निर्धारित ( कॅप लेव्हेल ) व विमा संरक्षित रक्कम रु. ६०,०००/- प्रमाणे आहे आणि विमा कंपनीने सदर निर्धारित दरापेक्षा जास्त विमा दर ( १६ टक्के ) नमूद केलेला असेल तर वाढलेल्या विमा दराच्या प्रमाणात विमा संरक्षित रक्कम कमी होईल व हवामान धोक्याची ( सहपत्र २ नूसार ) नुकसान भरपाईची रक्कम त्याप्रमाणात कमी होईल. निर्धारित विमा दर / विमा कंपनीने सादर केलेला दर = १२/१६=०.७५ गुणक येईल. १२ टक्के प्रमाणे निर्धारित सुरक्षित रक्कम ६०,००० * गुणक (०.७५ ) = ४५,००० /- संरक्षित रक्कम येईल. (सोबतचे परिगणना सहपत्र ३ कृपया पहावे ) कर्जदार शेतक-यांना व बिगर कर्जदार शेतक-यांना ही योजना समानरित्या लागू होईल. तथापि, सदर बिगर कर्जदार शेतक-यांना ही योजना केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार ऐच्छिक स्वरुपाची राहील.

विमा दर अनुदानाची परिगणना :- विमा दरासाठी अनुदान वरील संदर्भ क्रमांक १ मधील केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनेमाधील मुद्दा क्रमांक ११ मधील (११.२) नूसार विमा कंपनीने विमा दर हा ८ टक्के पेक्षा जास्त दिला असेल तर शेतक-यांकरिता विमा दर कमीत कमी ४.८ टक्के व जास्तीत जास्त ६ टक्के राहिल व उर्वरित वाढीव विमा दर हा मुद्दा क्रमांक ११ मधील ( ११.३ ) नूसार केंद्र व राज्य शासनाने ५०:५० या सम प्रमाणात अनुदान स्वरुपात द्यावयाचा आहे. उदा:- वरील परिच्छेद ६ मधील परिगणनेनूसार विमा संरक्षित रक्कम रु. ४५,०००/- या रक्कमेवर येणारा शेतक-यांकरीता विमा हप्ता रक्कम र. २,७०० /- व केंद्र व राज्य शासनाकडून प्रत्येकी २,२५०/- इतकी रक्कम विमा दराकरीता अनुदान देय होईल.(सोबतचे परिगणना सहपत्र ३ कृपया पहावे) प्रायोगिक तत्त्वावरील हवामान आधारीत फळपिक योजनेत अंतर्भूत होणारे (कर्जदार शेतकरी व बिगर शेतकरी) यांना सहपत्रामधीलजिल्हानिहाय संबंधित फळपिकांना सहपत्र ३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे विमा संरक्षित रक्कम व विमा दर अनुदेय राहील.

**(७) या योजने बाबतचे फळपिक व त्यांचे हंगामनिहाय वेळापत्रक पुढीलप्रमाणे आहे :-**

| अ.क्र. | अ.क्र. | फळपिक | अंतिम तारीख | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | कर्जदार शेतकरी / कर्ज घेतलेले व बॅंकेकडून अधिसुचित फळपिकासाठी पिक कर्ज मर्यादा मंजूर असलेले शेतकरी यांचा फळपिकांचा विमा करण्याची मुदत | संत्रा<br>मोसंबी | --- | ज्या शेतक-यांची अधिसूचित पिकासाठी (संत्रा व मोसंबी) बॅंकांकडून दिनांक १५ जून, २०१५ पर्यन्त कर्जमर्यादा मंजूर असेल त्या सर्व शेतक-यांच्या क्षेत्राचा विमा विहित |

| अ.क्र. | अ.क्र. | फळपिक | अंतिम तारीख | शेरा |
|---|---|---|---|---|
| | | | | मुदतीत करुन घेणे बँकांना अनिवार्य आहे. |
| २ | बँकांनी कर्जदार शेतक-यांची घोषणा पत्र (डिक्लेरेशन) संबंधीत विमा कंपनीस सादर करण्याची मुदत | संत्रा<br>मोसंबी | ३० जून, २०१५ संत्रा, मोसंबी पिकांसाठी | ---- |
| ३ | बिगर कर्जदार शेतक-यांनी विमा प्रस्ताव (प्रपोजल) बॅकाना सादर करण्याची मुदत | संत्रा<br>मोसंबी | २० जून, २०१५ संत्रा व मोसंबी पिकांसाठी | ऐच्छिक सहभाग |
| ४ | बिगर कर्जदार शेतक-यांची घोषणा पत्रे ( डिक्लेरेशन) बँकांनी संबंधित विमा कंपनीस सादर करण्याची मुदत | संत्रा<br>मोसंबी | ३० जून, २०१५ दोन फळपिकांसाठी | ---- |

**८) सदर योजनेतील हवामानाची आकडेवारी सादर करणे आणि नुकसान भरपाई अदा करणे याबाबतचे वेळापत्रक खालीलप्रमाणे राहील :-**

| तपशिल | कालावधी | शेरा |
|---|---|---|
| १) या योजनेत अधिसूचीत केलेल्या महसूल मंडळातील समाविष्ट केलेल्या हवामान घटकांची आकडेवारी सादर करणे | दर आठवड्याला दैनंदिन हवामान धोक्याची आकडेवारी सादर करणे | संबंधीत विमा कंपनी त्रयस्थ नोंदणीकृत संस्थेमार्फत स्थापित केलेल्या संदर्भ हवामान केंद्रामार्फत आकडेवारी उपलब्ध करुन देईल. |
| २) नुकसान भरपाई अदा करणे | विमा कालावधी संपल्यापासून ४५ दिवसांत देय होईल | संबंधीत विमा कंपनी विमा हप्ता अनुदान व निवडलेल्या हवामान घटकांची आकडेवारी वेळेत मिळण्याच्या अटीचे अधीन राहून शेतक-यांना बँका मार्फत परस्पर अदा करेल. |

९) **बँक सेवा शुल्क.**

कर्जदार व बिगर कर्जदार शेतकऱ्यांकडून जमा केलेल्या विमा हप्त्याच्या ४ टक्के रक्कम विमा कंपनीकडून बँक सेवा शुल्क म्हणून नोडल बँकाना परस्पर देय होईल.

१०) **नुकसान भरपाई ठरविण्याची पध्दत व इतर बाबी.**

नुकसान भरपाई ठरविण्याची पध्दत सहपत्र - ३ व ४ मध्ये दर्शविल्यानुसार राहील.

११) चोला मंडल एमएस जनरल इन्शुरन्स कंपनी, बजाज अलायन्स जनरल इन्शुरन्स कंपनी, इफको टोकिया जनरल इन्शुरस कंपनी, एचडीएफसी-अर्गो व रिलायन्स जनरल इन्शुरस कंपनी या संस्थेस योजनेत सहभागी होणाऱ्या शेतकऱ्यांना द्यावयाचे अनुदानासाठी राज्य शासनाच्या हिश्यापोटी देय होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखालील अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक डी-३

२४०१- पीक संवर्धन,

(००) ११० पीक विमा

(००) (०७) :- हवामानावर आधारीत फळपिक विमा योजना

३३ अर्थसहाय्य ( २४०१ ९४०२) ( योजनातंर्गत)

संचालक, फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे- १ यांना या योजनेचे मुख्य समन्वयक म्हणून घोषित करण्यात आलेले आहे व सहाय्यक संचालक, लेखा कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे- १ यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात आलेले आहे. या योजनेबाबत अधिसूचित तालुक्यातील निवडलेल्या महसूल मंडळ पातळीवर चोला मंडलम एमएस जनरल इन्शुरन्स कंपनी, बजाज अलायन्स जनरल इन्शुरन्स कंपनी, इफको टोकिया जनरल इन्शुरन्स कंपनी, एचडीएफसी-अर्गो व रिलायन्स कंपनी या संस्थेमार्फत फळपिक विमा योजना राबविण्याबाबत व संदर्भ हवामान केंद्र स्थापन करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करण्यात यावी.

१२) प्रायोगिक तत्त्वावरील हवामानावर आधारीत पथदर्शक फळपिक विमा योजनेचा आढावा राज्य स्तरीय पिक विमा समन्वय समितीच्या बैठकीत घेण्यात येऊन नवीन फळपिकांचा अंतर्भाव करणे / योजनेचे पुनर्विलोकन करुन योजना पुढे चालू ठेवणे याबाबतचा निर्णय घेण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१०१६१०१३५५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Maroti K Kendre

Digitally signed by Maroti K Kendre
DN: CN = Maroti K Kendre, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.11 16:37:53 +05'30'

**( मा.के.केन्द्रे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव

२. मा.मंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
४. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
५. मा.अप्पर मुख्य सचिव ( कृषि ) यांचे स्वीय सहाय्यक
६. प्रधान सचिव ( वित्त ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
७. प्रधान सचिव ( नियोजन ), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
८. प्रधान सचिव ( महसूल व वन ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
९. सचिव ( सहकार ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
१०. सचिव, कृषि मंत्रालय, भारत सरकार ( कृषि व सहकार विभाग )कृषि भवन, नवी दिल्ली (पत्राने)
११. सचिव, वित्त मंत्रालय, भारत सरकार ( वित्त विभाग ) (विमा) नवी दिल्ली ( पत्राने )
१२. संचालक, पिक विमा भारत सरकार, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग, नवी दिल्ली.
१३. आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. क्षेत्रीय व्यवस्थापक, इफको टोकिया जनरल इन्शुरन्स कंपनी लिमिटेड, रुरल अॅन्ड को. ऑपरेशन डिपार्टमेंट, ४ था मजला प्लॉट क्र.३ सेक्टर २९, गुरगाव, हरियाणा, १२२००१.
१५. क्षेत्रीय व्यवस्थापक, एचडीएफसी-अर्गो, पहिला मजला, १६५-१६६ बॅकवे रेक्लमेशन, एच.टी पारेख मार्ग, चर्चगेट, मुंबई ४००० २०.
१६. क्षेत्रीय व्यवस्थापक, चोला मंडलम एमएस जनरल इन्शुरन्स कंपनी, १०३ रुपा प्लाझा, जवाहर रोड घाटकोपर (पू), मुंबई ७७.
१७. क्षेत्रीय व्यवस्थापक, रिलायन्स जनरल इन्शुरन्स कंपनी, चिंतामणी अव्हेन्यु, ५ वा मजला, वेस्टर्न एक्सप्रेस हायवे, विरवानी इंडस्ट्रिज इस्टेट ( पश्चिम ), गोरेगाव, मुंबई ४०००६४
१८. क्षेत्रीय व्यवस्थापक, बजाज अलायन्स जनरल इन्शुरन कंपनी, पहिला मजला, टॉवर १, कॉमर्स झोन, समर्थ अशोक पथ, येरवडा, पुणे -६.
१९. संचालक लेखा व कोषागारे, मुंबई
२०. सर्व विभागीय आयुक्त,
२१. अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई - ३२.
२२. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
२३. महाव्यवस्थापक, महाराष्ट्र नागरी बॅक, ९ नगीनदास रोड, मुंबई-२३
२४. महाव्यवस्थापक, नाबार्ड, पुनम चेंबर , शिवसागर इस्टेट, वरळी, मुंबई
२५. महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
२६. विमा संचालक, म्हाडा इमारत, पहिला मजला, बांद्रा पूर्व, मुंबई
२७. संचालक, माहिती आणि प्रसिध्दी (प्रसिध्दीसाठी ) मंत्रालय, मुंबई
२८. संचालक, फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-०५
२९. संचालक, विस्तार व प्रशिक्षण, साखर संकुल, पुणे-०५

३०. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
३१. सर्व जिल्हाधिकारी,
३२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
३३. सर्व व्यवस्थापक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बॅक,
३४. सर्व विभागीय कृषि सह संचालक, महाराष्ट्र राज्य,
३५. उप महाव्यवस्थापक, नाबार्ड, पुनम चेंबर, ५४ वेलस्ली रोड, शिवाजीनगर, पुणे-५
३६. सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी बॅक , ९ नगीनदास रोड, मुंबई- २३
३७. मुख्य अधिकारी, सेंट्रल फायनान्स एजन्सी, महाराष्ट्र राज्य सहकारी बॅक , ९ नगीनदास रोड, मुंबई- २३
३८. मुख्य अधिकारी, ग्रामीण नियोजन व पत विभाग, रिझर्व्ह बॅक ऑफ इंडिया, फोर्ट, मुंबई
३९. व्यवस्थापक, महाराष्ट्र बॅक १५०१ , शिवाजीनगर, पुणे-५
४०. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
४१. सर्व सहसचिव /उपसचिव /अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय मुंबई - ०३२
४२. उपसचिव, नियोजन विभाग (कार्या.१४३१) / वित्त विभाग (व्यय-१)
४३. उपसचिव (अर्थसंकल्प), उपसचिव (१२अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय मुंबई - ०३२
४४. निवडनस्ती -१४ अे

## सहपत्र - १

## पथदर्शी हवामानावर आधारीत फळपिक विमा योजना सन २०१५-१६ साठी अधिसूचित फळपिके, जिल्हे, तालुके व महसूल मंडळे

| अ.क्र. | फळ पीक | जिल्हा | तालूके | महसूल मंडळ |
|---|---|---|---|---|
| | संत्रा | अकोला | बार्शी टाकळी | राजंदा |
| | | | मुर्तीजापूर | कुरूम, हातगाव, निंभा |
| | | | अकोट | अकोट, उमरा, पणज, अकोलखेड |
| | | | तेल्हारा | अडगाव (बु.) |
| | | | पातूर | पातूर |
| | | अमरावती | अमरावती | अमरावती, वडाळी, बडनेरा, नवसारी, डबरगांव, माहूली जहागिर, नांदगाव पेठ. |
| | | | भातकुली | निंभा. |
| | | | चांदूर रेल्वे | चांदूर रेल्वे, पळसखेड, घुईखेड, आमला विश्वेश्वर, सातेफळ |
| | | | धामणगांव रेल्वे | धामणगाव रेल्वे, चिंचोली, भातकुली, अंजनसिंगी, मंगरुळदस्तगिर, दत्तापूर, तळेगाव दशासर |
| | | | नांदगाव खंडेश्वर | नांदगाव खंडेश्वर, दाभा, शिवणी, रसूलापूर, मंगरुळ चव्हाळा, पाफळफीळ, लोणी, धानोरा गुरव, माहूलीचोर |
| | | | मोर्शी | अंबाडा, हिरवखेड, रिद्धपूर, धामणगाव (काटपूर), नेरपिंगळाई, शिरखेड, मोर्शी. |
| | | | वरुड | वरुड, बेनोदा, पुसला, वाठोडा, लोणी, शेंदूरजना घाट, राजोरा बाजार |
| | | | तिवसा | तिवसा, मोझरी, वऱ्हा, कुऱ्हा वरखेड |
| | | | चांदूर बाजार | चांदूर बाजार, ब्राम्हणवाडा थडी, बेलोरा, करजगाव, शिरसगाव कसबा, तळेगाव मोहना, आसेगाव |
| | | | अचलपूर | अचलपूर, रासेगाव, असतपूर, परसापूर, पथ्रोट, परतवाडा |
| | | | चिखलदरा | चिखलदरा, सेमाडोह, टेंभूरसोडा |
| | | | अंजनगाव सुर्जी | अंजनगाव, भंडारज, विहीगाव, सातेगाव, कापूसतळणी, कोकर्डा. |
| | | बुलढ़ाणा | मेहकर | मेहकर |
| | | | लोणार | अंजनी खुर्द, सुलतानपूर |
| | | | खामगाव | बोरी आडगाव. |
| | | | संग्रामपूर | सोनाळा, बावनबीर |
| | | यवतमाळ | कळंब | कळंब, कोठा, सावरगाव, जोडमोहा, पिंपळगाव (रु.) |
| | | | राळेगाव | राळेगाव, झाडगाव. |
| | | | पुसद | पुसद, जांबबाजार, वरुड |

| अ.क्र. | फळ पीक | जिल्हा | तालूके | महसूल मंडळ |
|---|---|---|---|---|
| | | | उमरखेड | उमरखेड, मुळावा, ढाणकी, विडुळ, चातारी |
| | | | महागाव | मोरथ, गुंज, काळी (दौ). |
| | | | दिग्रस | दिग्रस, कलगाव, तिवरी, तूपटाकळी. |
| | | | दारव्हा | दारव्हा, महागाव |
| | | | नेर | माणिकवाडा, वटफळी, शिरजगाव, मालखेड (खु.) |
| | | | आर्णी | आर्णी, जवळा. |
| | | | बाभुळगाव | घारपळ |
| | | वर्धा | आर्वी | आर्वी, रोहना, खरांगणा, वाढोणा. |
| | | | कारंजा | कारंजा, ठाणेगाव, सारवाडी, कन्नमवार ग्राम |
| | | | आष्टी | आष्टी, तळेगाव, साहूर |
| | | वाशिम | वाशिम | वाशिम, अणशिंग. |
| | | | रिसोड | रिसोड, केनवड, भरजहागीर. |
| | | | मालेगाव | मालेगाव, मुंगळा. |
| | | | मंगरुळपीर | मंगरुळपीर, शेलु (खु.) |
| | | | मानोरा | मानोरा, गिरोली. |
| | | | कारंजा | कारंजा, उंबर्डा बाजार, कामरगाव. |
| | | नागपूर | नागपूर | सोनेगाव (लोधी ), वाडी, बोरी, गोधणी, बुटीबोरी. |
| | | | कामठी | कामठी, वडोदा. |
| | | | हिंगणा | हिंगणा, कान्होलीवारा, आडेगाव, गुमगांव, टाकळघाट. |
| | | | रामटेक | देवलापार , रामटेक, मुसेवाडी |
| | | | पारशिवणी | पारशिवणी, नवेगाव खैरी, आमडी,कन्हान |
| | | | काटोल | काटोल, पारडशिंगा, येनवा, मेटपाजरा, रिधोरा, कोंढाळी. |
| | | | नरखेड | नरखेड, मोवाड, सावरगाव, भिष्णूर,जलालखेडा, मेढला. |
| | | | सावनेर | सावनेर, पाटण सावंगी, केळवद, खापा, बडेगाव. |
| | | | कळमेश्वर | कळमेश्वर, धापेवाडा, मोहपा, तेलकामठी. |
| | | | उमरेड | पाचगाव. |
| | | | भिवापूर | भिवापूर, कारगांव |
| | | | कुही | तितुर. |
| | | हिंगोली | हिंगोली | हिंगोली, डिग्रस कराळे,माळहिवरा, खंबाळा, सिरसम (बु.), नरसीनामदेव, बासंबा |
| | | | औंढानागनाथ | औंढानागनाथ, शिरड, जवळाबाजार, साळणा |
| | | | सेनगाव | बोरेगाव, आजेगाव, हत्ता, साखरा |

| अ.क्र. | फळ पीक | जिल्हा | तालूके | महसूल मंडळ |
|---|---|---|---|---|
| | | | कळमनुरी | कळमनुरी, वाकोडी, नांदापूर, आखाडाबाळापुर, डोंगरकडा, वारंगाफाटा |
| | | | वसमत | हायतनगर, गिरगाव, हट्टा, टेंभुर्नी, अंबा (चोंडी), |
| | मोसंबी | अमरावती | अमरावती | वडनेरा, डवरगांव ,माहुली जहांगिर, नांदगाव पेठ |
| | | | वरुड | वरुड, शेंदुररजनाघाट, लोणी, पुसळा, बेनोडा, वाठोडा, राजूरबाजार |
| | | | मोर्शी | मोर्शी, हिवरखेड, शिरखेड, अंबाडा, नेरपिंगळाइ |
| | | | तिवसा | तिवसा, वरखेड, वऱ्हा, मोझरी |
| | | | धामणगांव रेल्वे | धामणगांव रेल्वे, चिंचोली, अंजनसिंगी |
| | | बुलढाणा | सिंदखेड राजा | सिंदखेड राजा, सोनोशी, किनगाव राजा, दुसर बीड, नागामलकापूर (पांगरा), शेंदुरजन, साखरखेर्डा |
| | | नागपूर | नागपूर ग्रा | वाडी |
| | | | काटोल | काटोल ,मेंटपाजरा ,येनवा ,कोढांळी ,पारडशिंगा ,रिधोरा |
| | | | नरखेड | नरखेड ,सावरगाव ,जलालखेडा ,मोवाड ,मेंढला ,भिष्णूर |
| | | | सावनेर | केळवद ,खापा ,सावनेर ,पाटणसांवगी ,बडेगांव |
| | | | कळमेश्वर | कळमेश्वर ,मोहपा ,धापेवाडा ,तेलकामठी |
| | | वर्धा | कारंजा | कारंजा ,सारवाडी ,कन्नमवार ग्राम ,ठाणेगांव |
| | | | आष्टी | साहुर ,आष्टी ,तळेगांव |
| | | हिंगोली | हिंगोली | हिंगोली, डिग्रस, मालहिवरा, लिंमळा, शिरसम (बु.), नरसीनामदेव, बासंबा |
| | | | औंढानागनाथ | औंढानागनाथ, शिरड, जवळाबाजार, साळणा. |
| | | | सेनगाव | बोरेगाव, आजेगाव, हत्ता, साखरा |
| | | | कळमनुरी | कळमनुरी, वाकोडी, नांदापूर, आखाडाबाळापूर, डोंगरकडा, वारंगाफाटा |
| | | | वसमत | हायतनगर, गिरगाव, हट्टा, टेंभूर्नी, आंबा (चोंडी) |

## सहपत्र-२
## प्रायोगिक तत्वावरील हवामान आधारित फळ पिक विमा योजना २०१५-१६

**जिल्हे- अकोला, अमरावती, नागपूर, वर्धा, बुलढ़ाणा, हिंगोली, यवतमाळ व वाशिम**
**पिकाचे नांव :- संत्रा ( मृग बहार )**

ही योजना संत्रा पिकासाठी सोबतच्या सहपत्र-१ मध्ये नमूद केलेल्या अधिसुचित जिल्हयामधील तालुक्यातील निवडलेल्या महसूल मंडळात लागू करण्यात येईल. यानुसार निवडलेल्या विमा कंपनीमार्फत (सदरहू शासन निर्णयातील परिच्छेद ३ मधील ) अधिसूचित महसूल मंडळ पातळीवर त्रयस्थ संस्थेमार्फत संदर्भ हवामान केंद्र स्थापित करण्यात येईल. संबंधीत विमा कंपन्या संदर्भ हवामान केंद्रात नोंदविली जाणारी माहिती दर आठवडयाला संचालक फलोत्पादन यांच्या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देतील.

या योजनेतंर्गत संत्रा ( मृग बहार ) पिकास निवडलेल्या विमा कंपनीमार्फत खाली नमूद केलेल्या विमा संरक्षण कालावधीत निवडक हवामान धोक्यामुळे होणाऱ्या संभाव्य पिक नुकसानीस (आर्थिक) खालील प्रमाणे विमा संरक्षण प्रदान होईल.

| विमा संरक्षण प्रकार (हवामान धोके) व विमा संरक्षण कालावधी | प्रमाणके (ट्रिगर) व नुकसान भरपाई रक्कम * (प्रती हेक्टर रु) |
|---|---|
| कमी पाऊस<br>दि.१५ जून, २०१५ ते<br>दि. १५ जुलै, २०१५ | १) या कालावधीमध्ये १२४ मि.मि. व त्यापेक्षा कमी पाऊस झाल्यास १०० टक्के रु. ३०,०००/- नुकसानभरपाई देय होईल.<br>२) या कालावधीमध्ये १२४ मि.मि. पेक्षा जास्त ते १३५ मि.मि. पर्यंत पाऊस झाल्यास रु. २०,०००/- नुकसानभरपाई देय होईल.<br>३) या कालावधीमध्ये १३५ मि.मि. पेक्षा जास्त ते १५० मि.मि. पाऊस झाल्यास रु. १०,०००/- नुकसानभरपाई देय होईल. |
| पावसाचा खंड<br>दि. १६ जुलै, २०१५ ते<br>दि. १५ ऑगस्ट, २०१५ | १) या कालावधीमध्ये सलग १४ दिवस ते १५ दिवस पावसाचा खंड पडल्यास रु. १५,०००/- नुकसानभरपाई देय होईल.<br>२) सलग १६ दिवस ते १७ दिवस पावसाचा खंड पडल्यास रु. २५,०००/- नुकसानभरपाई देय होईल<br>३) सलग १८ दिवस किंवा त्यापेक्षा जास्त दिवसचा पावसाचा खंड पडल्यास रु. ३०,०००/- नुकसानभरपाई देय होईल.<br>( २.५ मि.मि. पर्यंत किंवा त्यापेक्षा कमी पाऊस पडला तरी तो खंड समजण्यात येईल.) |

**विमा योजनेत सहभाग प्रक्रिया :**

**कर्जदार शेतकरी :** अनिवार्य सहभाग, बॅकाकडून संत्रा ( मृग बहार ) पिकासाठी कर्ज मर्यादा मंजूर असणाऱ्या सर्व शेतकऱ्यांचा विमा हा त्या त्या बँकाकडून देण्यात त्यांना देण्यात येणा-या कर्ज पुरवठा रक्कमेमधून भरला जाईल.

**बिगर कर्जदार शेतकरी**: ऐच्छिक सहभाग, सदर शेतकऱ्यांनी विमा प्रस्ताव पत्रक भरुन रोख विमा हप्त्यासह आपले खाते असणाऱ्या बँक शाखेत विहित मुदतीत जमा करावे.

| | |
|---|---|
| एकूण विमा संरक्षित रक्कम (प्रती हेक्टर) | रुपये ६०,०००/-* |
| शेतकऱ्यांनी भरावयाचा विमा हप्ता (प्रती हेक्टर) | रुपये ३,६००/-* |

*** सहपत्र ३ नूसार विमा संरक्षित रक्कम व विमा हप्ता त्या त्या जिल्ह्यांला त्या अनुसूचित फळपिकांना लागू राहील.**

## सहपत्र-२

## प्रायोगिक तत्वावरील हवामान आधारित फळ पिक विमा योजना २०१५-१६

**जिल्हे - अमरावती, बुलढ़ाणा, नागपूर, हिंगोली व वर्धा**
**पिकाचे नांव :- मोसंबी ( मृग बहार )**

ही योजना मोसंबी (मृग बहार) पिकासाठी सोबतच्या सहपत्र-१ मध्ये नमूद केलेल्या अधिसुचित जिल्हयामधील तालुक्यातील निवडलेल्या महसूल मंडळात लागू करण्यात येईल. यानुसार निवडलेल्या विमा कंपनीमार्फत ( सदरहू शासन निर्णयातील परिच्छेद ३ मधील ) अधिसूचित महसूल मंडळ पातळीवर त्रयस्थ संस्थेमार्फत संदर्भ हवामान केंद्र स्थापित करण्यात येईल. संबंधीत विमा कंपन्या संदर्भ हवामान केंद्रात नोंदविली जाणारी माहिती दर आठवडयाला संचालक फलोत्पादन यांच्या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देतील. या योजनेतंर्गत मोसंबी ( मृग बहार ) पिकास निवडलेल्या विमा कंपनीमार्फत खाली नमूद केलेल्या विमा संरक्षण कालावधीत निवडक हवामान धोक्यामुळे होणाऱ्या संभाव्य पिक नुकसानीस (आर्थिक) खालील प्रमाणे विमा संरक्षण प्रदान होईल.

| विमा संरक्षण प्रकार (हवामान धोके) व विमा संरक्षण कालावधी | प्रमाणके (ट्रिगर) व नुकसान भरपाई रक्कम * (प्रती हेक्टर रु) |
|---|---|
| **कमी पाऊस**<br><br>**दि.१५ जून, २०१५ ते दि. १५ जुलै, २०१५** | १) या कालावधीमध्ये १२४ मि.मि. व त्यापेक्षा कमी पाऊस झाल्यास १०० टक्के रु. ३०,०००/- नुकसानभरपाई देय होईल.<br>२) या कालावधीमध्ये १२४ मि.मि. पेक्षा जास्त ते १३५ मि.मि. पर्यंत पाऊस झाल्यास रु. २०,०००/- नुकसानभरपाई देय होईल.<br>३) या कालावधीमध्ये १३५ मि.मि. पेक्षा जास्त ते १५० मि.मि. पाऊस झाल्यास रु. १०,०००/- नुकसानभरपाई देय होईल. |
| **पावसाचा खंड**<br><br>**दि. १६ जुलै, २०१५ ते दि.१५ ऑगस्ट, २०१५** | १) या कालावधीमध्ये सलग १४ दिवस ते १५ दिवस पावसाचा खंड पडल्यास रु. १५,०००/- नुकसानभरपाई देय होईल.<br>२) सलग १६ दिवस ते १७ दिवस पावसाचा खंड पडल्यास रु. २५,०००/- नुकसानभरपाई देय होईल<br>३) सलग १८ दिवस किंवा त्यापेक्षा जास्त दिवसचा पावसाचा खंड पडल्यास रु. ३०,०००/- नुकसानभरपाई देय होईल.<br>( २.५ मि.मि. पर्यंत किंवा त्यापेक्षा कमी पाऊस पडला तरी तो खंड समजण्यात येईल.) |

**विमा योजनेत सहभाग प्रक्रिया :**
**कर्जदार शेतकरी :** अनिवार्य सहभाग, बॅकाकडून मोसंबी पिकासाठी कर्ज मर्यादा मंजूर असणाऱ्या सर्व शेतकऱ्यांचा विमा हा त्या त्या बँकाकडून देण्यात त्यांना देण्यात येणा-या कर्ज पुरवठा रक्कमेमधून भरला जाईल.
**बिगर कर्जदार शेतकरी**: ऐच्छीक सहभाग, सदर शेतकऱ्यांनी विमा प्रस्ताव पत्रक भरुन रोख विमा हप्त्यासह आपले खाते असणाऱ्या बँक शाखेत विहित मुदतीत जमा करावे.

| | |
|---|---|
| एकूण विमा संरक्षित रक्कम (प्रती हेक्टर) | रुपये ६०,०००/-* |
| शेतकऱ्यांनी भरावयाचा विमा हप्ता (प्रती हेक्टर) | रुपये ३,६००/-* |

*** सहपत्र ३ नूसार विमा संरक्षित रक्कम व विमा हप्ता त्या त्या जिल्ह्यांला त्या अनुसूचित फळपिकांना लागू राहील.**

## सहपत्र - ३

## प्रायोगिक तत्वावरील हवामान आधारीत फळपिक विमा योजना २०१५-१६
## विमा दराची परी गणना ( वेटेड ॲव्हरेज व विमा कंपनीने सादर केलेल्या कमीत कमी विमा दरानुसार. )

| अ. क्र | जिल्हा | फळपिकाचे नाव | फळपिका खालील क्षेत्र | विमा कंपनीचे नाव | विमा संरक्षित रक्कम | विमा कंपनीने प्रस्तावित केलेले विमा दर | कमी झालेली विमा संरक्षित रक्कम | विमा दरात शेतकरी हिस्सा | विमा दरात केंद्राचा हिस्सा | विमा दरात राज्याचा हिस्सा | एकूण विमा हत्पा | शेतक-यांकरित ा विमा दर |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | अमरावती | संत्रा | ६१३१५ | HDFC ERGO | ६०,००० | ११.०० | ६०,००० | ३,३०० | १,६५० | १,६५० | ६,६०० | ५.५० |
| | | मोसंबी | १६९७ | | ६०,००० | ११.०० | ६०,००० | ३,३०० | १,६५० | १,६५० | ६,६०० | ५.५० |
| २ | अकोला | संत्रा | ७५६० | Iffico Tokiyo | ६०,००० | १८.०० | ४०,००० | २,४०० | २,४०० | २,४०० | ७,२०० | ६.०० |
| ३ | यवतमाळ | संत्रा | १२३५ | Chola Mandalam | ६०,००० | ९.०० | ६०,००० | २,८८० | १,२६० | १,२६० | ५,४०० | ४.८ |
| ४ | नागपूर | संत्रा | १३५५१ | Bajaj Allianz | ६०,००० | १०.५० | ६०,००० | ३,१५० | १,५७५ | १,५७५ | ६,३०० | ५.२५ |
| | | मोसंबी | ३८७० | | ६०,००० | १०.५० | ६०,००० | ३,१५० | १,५७५ | १,५७५ | ६,३०० | ५.२५ |
| ५ | वर्धा | संत्रा | १४४२२ | Reliance | ६०,००० | ११.४६ | ६०,००० | ३,४३८ | १,७१९ | १,७१९ | ६,८७६ | ५.७३ |
| | | मोसंबी | २२५० | | ६०,००० | ११.४६ | ६०,००० | ३,४३८ | १,७१९ | १,७१९ | ६,८७६ | ५.७३ |
| ६ | हिंगोली | संत्रा | ३१०० | Bajaj Allianz | ६०,००० | १२.०० | ६०,००० | ३,६०० | १,८०० | १,८०० | ७,२०० | ६.०० |
| | | मोसंबी | २६५० | | ६०,००० | १२.०० | ६०,००० | ३,६०० | १,८०० | १,८०० | ७,२०० | ६.०० |
| ७ | वाशिम | संत्रा | ११८६५ | Bajaj Allianz | ६०,००० | १६.०० | ४५,००० | २,७०० | २,२५० | २,२५० | ७,२०० | ६.०० |
| ८ | बुलढ़ाणा | संत्रा | २११६ | Chola Mandalam | ६०,००० | १८.०० | ४०,००० | २,४०० | २,४०० | २,४०० | ७,२०० | ६.०० |
| | | मोसंबी | १४३२ | | ६०,००० | १८.०० | ४०,००० | २,४०० | २,४०० | २,४०० | ७,२०० | ६.०० |

## <u>सहपत्र -४</u>

## <u>प्रायोगिक तत्वावरील हवामान आधारीत फळपिक विमा योजना २०१५-१६</u>

### <u>नुकसान भरपाई ठरविण्याची पध्दत व इतर बाबी:-</u>

१) प्रायोगिक तत्त्वावरील हवामानावर आधारीत पिकविमा योजने अंतर्गत विमा प्रस्तावानुसार देय होणारी नुकसान भरपाई पूर्णपणे संबंधीत विमा कंपनी शेतकऱ्यास सहपत्र २ व ३ नुसार परस्पर बँकेमार्फत अदा करणार आहे. विहित नमुन्यात व मुदतीत वित्तीय संस्थानी प्रस्ताव विमा कंपनीकडे विमा हप्त्यासह सादर करणे आवश्यक आहे. तसे न केल्यास होणाऱ्या नुकसान भरपाई देण्याची जबाबदारी वित्तीय संस्थेची राहील.

२) नुकसान भरपाई विहित मुदतीत देण्याची जबाबदारी व दायित्व संबंधित विमा कंपन्याची राहील याबाबतचे नुकसान भरपाई देण्याचे कोणतेही दायित्व शासनावर राहणार नाही.

३) नुकसान भरपाई ठरविण्याचा आराखडा मागील २५ वर्षाच्या हवामानाच्या आकडेवारीचा विचार करण्यात आलेला आहे. त्यानुसार प्रत्येक अधिसूचित फळपिकासाठी प्रमाणके (ट्रिगर) व देय विमा रक्कमेचा दर केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार निश्चित करण्यात आलेले आहेत. त्यानुसार (सहपत्र २ व ३ प्रमाणे) निर्धारीत दराने विमा रक्कम संबंधीत विमा कंपनी मार्फत परस्पर देय होईल.

४) संदर्भ हवामान केंद्र हे त्या संबंधीत विमा कंपनीने नोंदणीकृत त्रयस्थ संस्थेमार्फत स्थापित केलेले हवामान केंद्र राहील.

५) संबंधीत विमा कंपनी देय विमा रक्कम ठरविण्यासाठी अधिसूचित केलेल्या फळपिकासाठी व त्यासाठी निवडलेल्या जिल्हा व त्यामधील तालुक्यातील महसुल मंडळात (सहपत्र-१) नोंदणीकृत त्रयस्थ संस्थेमार्फत स्थापित केलेल्या संदर्भ हवामान केंद्रामध्ये नोंद झालेल्या आकडेवारीचा वापर करील.

६) जर त्या महसुल मंडळातील संदर्भ हवामान केंद्रामार्फत काही कारणास्तव आकडेवारी प्राप्त झाली नाही तर त्या कालावधीपुरती पर्यायी राज्य शासनाच्या / कृषि विद्यापीठे / कृषि विज्ञान केंद्र हवामान केंद्राचीआकडेवारी विचारात घेवून देय विमा रक्कम निश्चित करण्यात येईल.

७) महसुल मंडळात स्थापन झालेल्या किंवा वरील अनुक्रमांक "६" प्रमाणे संदर्भ हवामान केंद्रामार्फत प्राप्त आकडेवारी ही ग्राह्य धरण्यात येवून त्यावर आधारीत योजनेच्या तरतुदी नुसार निश्चित करण्यात आलेली विमा रक्कम ही अंतिम राहील.

८) राष्ट्रीय कृषि विमा योजनेनुसार स्थापित राज्यस्तरीय समन्वय समिती, राज्य स्तरीय तांत्रिक समिती तसेच निर्धारीत वित्तीय संस्था, राज्यशासन, विमा कंपनी, कृषि आयुक्तालय यांची निर्धारीत कर्तव्ये व जबाबदाऱ्यांप्रमाणेच हवामान आधारित पीक विमा योजनेसाठी कर्तव्य व जबाबदाऱ्या राहतील. योजने संबंधीत सर्व माहिती, विमा कंपनी शासनास आवश्यक असलेली माहिती वेळोवेळी त्वरीत उपलब्ध करुन देतील. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक सीआयएस-१२९९/सीआर ८९/११ ए, दि. ४ डिंसेंबर, १९९९ अन्वये

जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अधिनस्त कार्यरत असलेल्या समितीने यापुढे या योजनेचा प्रतिमहा आढ़ावा घ्यावा.

९) राज्यातील जिल्ह्यातील फळपिकाखाली एकूण वीस हेक्टर किंवा जास्त हेक्टर क्षेत्र असलेल्या सर्व महसुल मंडळात योजना राबविण्यात येणार आहे. त्यानुसार महसुल मंडळे शासन निर्णयात समाविष्ट करण्यात आलेली आहे. या व्यतिरिक्त अतिरिक्त महसुल मंडळाचा प्रस्ताव प्राप्त झाल्यास संबंधित विमा कंपनीच्या सहमतीने या महसुल मंडळांचा समावेश करण्याचा अधिकार संचालक ( फलोत्पादन ) यांना राहिल. निवडलेल्या संबंधित विमा कंपनीने तात्काळ योजनेची अंमलबजावणी सुरु करावी व योग्य ती प्रचार प्रसिध्दी करुन योजना प्रभावीपणे कार्यान्वीत होईल हे पहावे.

१० ) या योजनेत हवामान धोक्याच्या नोंदणीबाबत तालुका स्तरावर व उप विभाग स्तरावर प्राप्त होणा-या तक्रारीचे निरसन करण्यासाठी उप विभाग स्तरावर व विभागीय स्तरावर स्थापन केलेल्या समितीमार्फत कार्यवाही करावी. या समितिची रचना खालीलप्रमाणे असेल :-

**उप विभागीय स्थर समिती**

| | | |
|---|---|---|
| १) | उप विभागीय कृषि अधिकारी | अध्यक्ष |
| २) | कृषि विद्यापीठ प्रतिनिधी | सदस्य |
| ३) | विमा कंपनी प्रतिनिधी | सदस्य |
| ४) | कृषि विकास अधिकारी जि.प. कार्यालय अंतर्गत पंचायत समिती कार्यालयातील कृषि अधिकारी | सदस्य |
| ५) | उप विभागीय कृषि अधिकारी कार्यालयातील तंत्र अधिकारी / कृषि अधिकारी | सदस्य सचिव |

व

**विभागीय स्थर समिती**

| | | |
|---|---|---|
| १) | विभागीय कृषि सहसंचालक कार्यालयातील अधिक्षक कृषी अधिकारी | अध्यक्ष |
| २) | संबंधित जिल्ह्याचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | सदस्य |
| ३) | विमा कंपनीचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४) | कृषि विद्यापीठ शास्त्रज्ञ / प्रतिनिधी | सदस्य |
| ५) | विभागीय सांख्यिकी | सदस्य सचिव |

याबाबत दोन्ही समितींकडे तक्रारीचे समाधान न झाल्यास संचालक ( फलोत्पादन ) स्तरावर बैठक आयोजित करण्यात येईल.

११) सहकार आयुक्तांना राज्यातील सहकारी, राष्ट्रीयकृत व इतर बँकाना या योजनेतील तरतूदीप्रमाणे विमा प्रस्ताव विमा कंपन्याना सादर करण्याबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात प्राधिकृत करण्यात येत आहे.

* * * * * * * * *